**भटक्या कुत्र्यांची वाढती संख्या मर्यादित ठेवणे, रेबीज निर्मुलन करणे, मनुष्य-कुत्रा संघर्ष टाळणे, ॲनिमल बर्थ कंट्रोल मॉनिटर करणे इत्यादि बाबींच्या अनुषंगाने सविस्तर धोरण निश्चित करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विकास विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : पविआ-१०२३/प्र.क्र. ८३/पदुम-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १७ जुलै, २०२३.

वाचा :- १) नगर विकास विभाग, शासन निर्णय,क्रमांक याचिका-२०१६/प्र.क्र.२७५/नवि-२०, दिनांक ११.०८. २०१६.

२) नगर विकास विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक याचिका-२०१६/प्र.क्र.२७५/नवि-२०, दिनांक ११.११.२०१६.

३) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय,क्रमांक याचिका-२०१७/प्र.क्र.४१८/पंरा-३, दिनांक २०.०१. २०१८.

**प्रस्तावना :**

सन २०२२ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये लक्षवेधी सूचना क्र. १८०६ या लक्षवेधीस अनुसरुन केलेल्या निवेदनामध्ये नमूद केल्याप्रमाणे भटक्या कुत्र्यांची वाढती संख्या मर्यादित ठेवणे, रेबीज निर्मुलन करणे, मनुष्य-कुत्रा संघर्ष टाळणे, ॲनिमल बर्थ कंट्रोल मॉनिटर करणे इत्यादि बाबींच्या अनुषंगाने सविस्तर धोरण निश्चित करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत आश्वासित करण्यात आले आहे.

२. भटक्या कुत्र्यांमुळे निर्माण होणाऱ्या वाढत्या समस्यांच्या संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयात याचिका क्र. ६९१/२००९ दाखल झाली होती. सदर याचिकेच्या अनुषंगाने दि. १८.११.२०१५ व दि. ०९.०३.२०१६ रोजी झालेल्या सुनावणीच्या वेळी मा. न्यायालयाने दिलेल्या निदेशानुसार ॲनिमल वेलफेअर बोर्ड ऑफ इंडिया केंद्र शासन यांनी दाखल केलेल्या शपथपत्रात नमूद केल्यानुसार कुत्र्यांची वाढती संख्या मर्यादित ठेवण्यासाठी, रेबिज निर्मुलनासाठी आणि मनुष्य कुत्रा संघर्ष टाळण्यासाठी नगरविकास विभागाने वाचा अ. क्र. १ येथील दिनांक ११.०८.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय देखरेख समिती गठीत केलेली आहे.

३. तसेच उक्त याचिकेच्या अनुषंगाने मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ०४.१०.२०१६ रोजी दिलेले आदेश विचारात घेऊन भटक्या कुत्र्यांचा बंदोबस्त करण्यासंदर्भात स्थानिक स्वराज्य संस्थांनी कोणती कार्यवाही करावी, याबाबतचे निर्देश नगरविकास विभागाने वाचा अ. क्र. २ येथील दिनांक ११.११.२०१६ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेले आहे. सदर परिपत्रकामध्ये ॲनिमल बर्थ कंट्रोल (Dogs) रुल्स, २००१ मधील तरतूदीनुसार ॲनिमल बर्थ कंट्रोल प्रोग्राम राबविण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावर ॲनिमल बर्थ कंट्रोल मॉनिटरींग कमिटी स्थापन करणे, ॲनिमल बर्थ कंट्रोल प्रोग्राम राबविण्यासाठी संस्थांची निवड करुन नियुक्ती करणे इ. अनुषंगीक बाबीच्या

कार्यवाही संदर्भात निर्देश देण्यात आलेले आहे. तसेच मा. सर्वोच्च न्यायालयातील उक्त याचिकेच्या अनुषंगाने दिनांक ०४.१०.२०१६ रोजी दिलेल्या आदेशाचे सर्व ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांनी काटकोरपणे पालन करावे आणि सदर आदेशात नमूद केल्यानुसार प्रत्येक ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थानी ॲनिमल बर्थ कंट्रोल (Dogs) रुल्स, २००१ अन्वये ॲनिमल बर्थ कंट्रोल मॉनिटरींग कमिटी स्थापन करण्याचे आदेश ग्रामविकास विभागाने वाचा क्र. ३ येथील दिनांक २०.०१.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेले आहेत. सदर समित्या प्रामुख्याने ॲनिमल बर्थ कंट्रोल (Dogs) रुल्स, २००१ मधील तरतूदीनुसार डॉग कंट्रोल प्रोग्रामचे नियोजन व व्यवस्थापन करणे, भटक्या कुत्र्यांना पकडणे, वाहतूक, नसबंदी, लसीकरण करणे व औषधोपचार करुन कुत्र्यांना सोडून देणे इ. अनुषंगीक कामे करण्याची जबाबदारी या समित्यांची आहे.

४. उपरोक्त बाबी विचारात घेता, यासंदर्भात सविस्तर धोरण विहीत करणे आवश्यक आहे. त्यासाठी सदर विषयाच्या अनुषंगाने अखिल भारतीय जीव जन्तु कल्याण मंडळ (AWBI), नगरविकास विभाग व ग्रामविकास विभाग यांनी वेळोवेळी दिलेले निर्देश त्याचप्रमाणे केंद्र शासनाच्या प्राण्यांना क्रुरतेने वागविण्यास प्रतिबंध करण्याबाबत अधिनियम, १९६० आणि यासंदर्भात अस्तित्वात असलेले सर्व नियम इ. बाबींचा सर्वकष अभ्यास करुन सविस्तर धोरण निश्चित करण्यासाठी सर्व संबंधीत विभागाच्या अधिकाऱ्यांची समिती गठीत करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

५. वर नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, यासंदर्भात खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

(१) प्रधान सचिव (पदुम) - अध्यक्ष
(२) प्रधान सचिव/अ.मु.स., नगर विकास किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी- सदस्य
(३) प्रधान सचिव, आरोग्य किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी - सदस्य
(४) प्रधान सचिव, ग्रामविकास किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी - सदस्य
(५) आयुक्त, पशुसंवर्धन - सदस्य
(६) मुख्य कार्यकारी अधिकारी, CIDCO किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी-सदस्य
(७) ॲनिमल वेलफेअर बोर्ड ऑफ इंडिया यांचे प्रतिनिधी - सदस्य
(८) महाराष्ट्र प्राणी कल्याण मंडळाचे सदस्य सचिव - सदस्य
(९) आयुक्त तथा संचालक,नगरपरिषद प्रशासन संचालनालय - सदस्य
(१०) आयुक्त,बृहन्मुंबई महानगरपालीका यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी - सदस्य
(११) आयुक्त, ठाणे महानगरपालीका यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी - सदस्य
(१२) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालीका यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी - सदस्य
(१३) श्री. अबोध आरस, Welfare of stray dogs,फोर्ट, मुंबई - सदस्य
(१४) डॉ. मकरंद चव्हाण, सचिव, Pet Practitioners Association of Mumbai, दादर मुंबई. - सदस्य
(१५) उपायुक्त, गुणनियंत्रण प्रयोगशाळा, गोरेगांव - सदस्य सचिव

६. **समितीची कार्यकक्षा** :-

(i) केंद्र शासनाच्या प्राण्यांना क्रुरतेने वागविण्यास प्रतिबंध करण्याबाबत अधिनियम, १९६० तसेच महारष्ट्र प्राणी रक्षण अधिनियम, १९७६ या अधिनियमातील त्याचप्रमाणे अधिनियमातंर्गत

प्रसिध्द केलेले विविध नियमांमधील तरतूदी विचारात घेऊन राज्यातील भटक्या कुत्र्यांमुळे निर्माण होणाऱ्या वाढत्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी शिफारस करणे

(ii) भटक्या कुत्र्यांची वाढती संख्या मर्यादित ठेवणे / रेबीज निर्मुलन करणे इ. संदर्भात मा. उच्च न्यायालय / मा. सर्वोच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेले आदेश त्याचप्रमाणे यासंदर्भात केंद्रशासनाने निर्गमित केलेले नियम विचारात घेण्यासाठी शिफारस करणे.

(iii) केंद्र शासनाच्या ॲनिलम बर्थ कंट्रोल (डॉग्ज रुल),२००१ मधील तरतूदीनुसार डॉग्ज कंट्रोल प्रोग्रामचे नियोजन, व्यवस्थापन, भटक्या कुत्र्यांना पकडणे, वाहतूक, नसबंदी, लसीकरण करणे व औषधोपचार करुन कुत्र्यांना सोडून देणे इ. अनुषंगीक कामे करण्यासाठी ग्रामिण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावर नियुक्त करण्यात आलेल्या समित्यांच्या कामाचा आढावा घेऊन सदर समित्या अधिक क्षमतेने कार्यरत करण्यासाठी शिफारस करणे.

(iv) जखमी आजारी भटक्या कुत्र्यांसाठी पशुवैद्यकीय दवाखान्याची आवश्यकता, श्वान निर्विजीकरण केंद्रे, नसबंदी इ. संदर्भात कार्यवाही करण्याची ग्रामपंचायत, नगरपालिका, महापालिका यांची जबाबदारी निश्चित करणे.

(v) तसेच प्रत्येक मोठ्या गावात, तालुक्यात, शहरात, महानगरात श्वान गणना व त्यांची नोंदणी करून भटके व पाळीव कुत्रे किती आहेत, याची संख्या निश्चित करून एकही भटका कुत्रा रस्त्यावर राहणार नाही अशी प्रभावी अंमलबाजवणी करण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

(vi) निर्बिजीकरणसाठी, जखमी कुत्र्यांवर उपचार करण्यासाठी "श्वानगृहे" तयार करण्याची आवश्यकता विचारात घेऊन उपाययोजना सुचविणे.

(vii) तसेच प्राणीप्रेमी किंवा दत्तक घेऊ इच्छिणाऱ्या व्यक्तीला कुत्रा दत्तक घेण्यासाठी श्वान दत्तक योजना राबविता येईल किंवा कसे, असल्यास यासंदर्भातील योजनेचे स्वरुप.

(viii) प्रस्तुत विषयाचा आवाका मोठा असल्यामुळे यासंदर्भात वरील मुद्यांव्यतीरीक्त समितीस आवश्यक वाटतील अशा बाबींची शिफारस करणे.

७. सदर समितीने त्यांचा अहवाल समिती गठीत झाल्यापासून ३ महिन्याचा आत सादर करावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०७१७१७५९१२४४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Marale Niwrutti Bhaguji

Digitally signed by Marale Niwrutti Bhaguji
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, pseudonym=85DEC352A563C6C48CE612C5F1F3DBE440A34530, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=Marale Niwrutti Bhaguji
Date: 2023.07.17 18:00:35 +05'30'

**( नि. भा. मराळे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव

३) मा. उपमुख्यमंत्री महोदय यांचे सचिव
४) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालीका
५) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, आरोग्य विभाग, जी. टी. हॉस्पीटल रोड, मुंबई.
७) प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
८) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) आयुक्त, ठाणे महानगरपालीका
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, CIDCO.
११) आयुक्त, नवी मंबई महानगरपालीका
१२) ॲनिमल वेलफेअर बोर्ड ऑफ इंडिया, हरियाणा.
१३) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१४) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
१५) महाराष्ट्र प्राणी कल्याण मंडळाचे सदस्य सचिव
१६) श्री. अबोध आरस, Welfare of stray dogs,फोर्ट, मुंबई.
१७) डॉ. मकरंद चव्हाण, सचिव, Pet Practitioners Association of Mumbai, दादर मुंबई.
१८) निवड नस्ती (पदुम-३)